गृहनिर्माण विभागासाठी नवीन स्कॅनरचा पुरवठा केल्याचे देयक अदा करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- संकिर्ण-२०२५ /प्र.क्र. ०३ /नों.शा.,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- २० मार्च, २०२५.

**प्रस्तावना** :-

गृहनिर्माण विभागात सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात नवीन ९ स्कॅनर उपकरणांची खरेदी प्रस्तावित होती. या प्रस्तावास विभागीय खरेदी समितीने मान्यता दिली होती. शासन निर्णय दिनांक ०७.०५.२०२१ मध्ये नमूद विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन निविदा मागविण्यात आल्या. पाच निविदाकारांनी दरपत्रके सादर केली, प्राप्त निविदांपैकी मे. गाडेकर एन्टरप्रायझेस, मुंबई निविदाकार यांनी सर्वात न्युनतम दर सादर केल्याने, सर्व अटि व शर्तींच्या अनुषंगाने त्यांना पात्र ठरविण्यात आले. गृहनिर्माण विभागातील सर्व कार्यसनातील नस्त्यांचे स्कॅनिंग करणे व त्याचे ई-ऑफिस करणे क्रमप्राप्त असल्याने, उद्योग विभागाच्या शासन निर्णय दिनांक ०७.०५.२०२१ मधील सुधारित तरतूदीनुसार रु. १०.००/- लाखाच्या मर्यादेत संगणकीय उपकरणे(स्कॅनर) खरेदी करण्याबाबतचा निर्णय या विभागाने घेतला.

**शासन निर्णय** :-

गृहनिर्माण विभागात स्कॅनर उपकरणांची निकड लक्षात घेऊन मे. गाडेकर एन्टरप्रायझेस, मुंबई या संस्थेकडून उद्योग विभागाच्या खरेदी धोरणातील परिच्छेद क्र. ४.२ मधील तरतूदीनुसार व उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या शासन निर्णय दिनांक ०७.०५.२०२१ मधील सुधारित वाढीव तरतूदीनुसार विभागाने नवीन ९ स्कॅनर या उपकरणांची रु.६,४५,६९६/- (अक्षरी रुपये सहा लाख पंचेचाळीस हजार सहाशे शहाण्णव फक्त) इतक्या किंमतीत खरेदी करण्यात आली.

२. नवीन स्कॅनर उपकरणांची खरेदी माहिती व तंत्रज्ञान विभाग यांचेकडून प्राप्त विनिर्देशानुसार (Specification) करण्यात आली आहे. तसेच, शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक: - भाखंस - २०१४/ प्र.क्र. ८२ (भाग III)/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ नुसार खरेदी करण्यात आली असून, शासन निर्णयातील परिच्छेद क्र. ४.७ नुसार माल स्वीकारताना घ्यावयाची दक्षता तसेच, साठा नोंदवहीत (जडवस्तूसंग्रह नोंदवही) नोंद घेऊन खरेदी करण्यात आलेल्या वस्तूंचा विनियोग करण्यात आलेला आहे.

३. सदर रक्कम आहरीत करुन अदा करण्यासाठी प्रस्तुत प्रकरणी गृहनिर्माण विभागाचे अवर सचिव यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि उप सचिव यांना विभागाचे नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. यासाठी होणारा खर्च आर्थिक वर्ष २०२४-२५ अंतर्गत मागणी क्र. क्यु. ४, ३४५१-सेक्रेटरीएट आर्थिक सेवा-०९०-सेक्रेटरिएट, (००)(०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्पाची अंमलबजावणी, ३४५१ २७४६ (३१), सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली तरतूद करण्यात आलेल्या रक्कमेमधून भागविण्यात यावा.

**५.** नवीन स्कॅनर उपकरणांची खरेदी करताना वित्त विभाग शासन निर्णय दिनांक १२.०१.२०२३ मध्ये नमूद अटी व शर्तींची पुर्तता करण्यात आली आहे. सदर अनुदान हे सशर्त स्वरूपाचे असून, सदर अनुदानाचा विनियोग केल्यानंतर उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात येईल.

**६.** उपरोक्त रक्कमेची अदायगी मे. गाडेकर एन्टरप्रायझेस, मुंबई यांच्या नावे जमा करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२०१६४८०७७१०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SUNIL VITTHAL UKIRADE

Digitally signed by SUNIL VITTHAL UKIRADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT, 2.5.4.20=f1675ab906bc1ceaccfbc91a08ebb1af88bab8226074b0ac8613e6304e94f278, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=902164C64C3FBA37F940B9E5A180D28DD1440382E63E7302A5E29F41123A9B06, cn=SUNIL VITTHAL UKIRADE
Date: 2025.03.20 16:49:37 +05'30'

**( सु. वि. उकिरडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:- माहितीस्तव व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित,**

१. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई
२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई ( रोख शाखा मार्फत )
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
४. रोख शाखा (२ जादा प्रतींसह)
५. मे. गाडेकर एन्टरप्रायझेस, वाडीबंदर, भाऊचा धक्का समोर, मुंबई - ४००००९./
मे. गाडेकर एन्टरप्रायझेस,सी- २००९, स्टेशन प्लाझा, भांडूप (पश्चिम), मुंबई - ४०००७८.
६. निवडनस्ती.